**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०१७-१८ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.२७२/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०५.०७.२०१७.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२४/००५३/५०३/१७-१८, दिनांक ९.०६.२०१७.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ५.०६.२०१७ व दिनांक ८.०६.२०१७.
४) शासन निर्णय क्र. एस-१०/२०१७/प्र.क्र.२७८/फ-३, दिनांक ४.०७.२०१७.
५) शासन निर्णय क्र. एस-१०/२०१७/प्र.क्र.३९१/फ-३, दिनांक ४.०७.२०१७.

**प्रस्तावना :**

राज्य योजनेअंतर्गत सन २०१७-१८ करिता राखीव वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) योजनांतर्गत एकूण रु.१०२०.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

अमरावती वनवृत्तातील वडाळी वन विभागातील फॉ.स.नं. ५०, ५१, ७४, ७५ व ७९ येथील वनजमिनीवर चेनलिंक फेंन्सिंगद्वारे संरक्षक भिंतींचे बांधकाम करण्यासाठीच्या रु. ८७,४५,५००/- च्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये तसेच पुणे वनवृत्तातील शिरुर वनपरिक्षेत्रातील मौजे शिरुर व कोरेगांव भिमा येथील वनक्षेत्राभोवती संरक्षक भिंत बांधण्यासाठीच्या एकूण रु. १,९१,१९,२००/- च्या २ अंदाजपत्रकांस संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार, सन २०१७ मध्ये भांडवली योजनेसाठी अर्थसंकल्पित १०० % निधीचे वितरण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. प्रकरणी अर्थसंकल्पित एकूण रु.१०२०.०० लक्ष (०२ मजूरी- रु. १७३.०० लक्ष, लहान बांधकामे- रु. २१७.०० लक्ष व ५३ मोठे बांधकामे - रु.६३०.०० लक्ष) निधी पैकी आतापर्यंत संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयांन्वये एकूण रु. २५०.५५ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. उर्वरित रु. ७६९.४५ लक्ष निधीपैकी आता प्रस्तावित अमरावती व पुणे वनवृत्तातील सदर वनजमिनीवर संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याकरिता आवश्यक एकूण रुपये रु. २,७८,६४,७०० /- निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

सन २०१७-१८ करिता "राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत एकूण रु. १०२०.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधीच्या मर्यादेत प्रस्तावांतर्गत अमरावती व पुणे वनवृत्तातील विविध प्रस्तावित वनक्षेत्रासभोवती संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याकरिता आवश्यक एकूण **रु.२,७८,६४,७००/-** (०२ मजूरी- रु. ४७,२५,८५३/- + २७ लहान बांधकामे रु. ५९,२९,६०८/- + ५३ मोठे बांधकामे

रु.१,७२,०९,२३९/-) इतका निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | वनवृत्त | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता प्रदान रक्कम | वितरित रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | **अमरावती** | अमरावती वन विभागातील वडाळी वन परिक्षेत्रातील फॉ.स.नं. ५०, ५१, ७४, ७५, ७९ चे वनक्षेत्रासभोवार चेनलिंक फेंन्सिंगद्वारे संरक्षक भिंत बांधणे. | ८७,४५,५००/- | ८७,४५,५००/- |
| | **एकूण** | | **८७,४५,५००/-** | **८७,४५,५००/-** |
| २ | **पुणे** | शिरुर वनपरिक्षेत्रातील मौजे शिरुर फॉ. गट नं. ११४० येथे (१९८० मी. लांबी) संरक्षक भिंत बांधणे. | ९७,७८,२००/- | ९७,७८,२००/- |
| ३ | | शिरुर वनपरिक्षेत्रातील मौजे कोरेगांव भिमा फॉ. कं. नं. ३०३ येथे (१९२० मी. लांबी) संरक्षक भिंत बांधणे. | ९३,४१,०००/- | ९३,४१,०००/- |
| | **एकूण** | | **१,९१,१९,२००/-** | **१,९१,१९,२००/-** |
| **एकूण एकंदर** | | | **२,७८,६४,७०० /-** | **२,७८,६४,७०० /-** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही सन २०१७-१८ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१७-१८ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१६ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०५११३०२९२४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.07.05 11:31:59 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

<u>प्रत :-</u>

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती / पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) उप वनसंरक्षक, अमरावती / पुणे.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.